कै.लोकनेते नानासाहेब उत्तमराव पाटील बहुउद्देशिय मित्र मंडळ, नाशिक संचलित विद्या विकास प्राथमिक विद्यामंदिर, काझी गढी, कुंभार टेक, जि.नाशिक या शाळेचे दत्तनगर, चुंचाळे शिवार, अंबड, जि.नाशिक येथे केलेल्या स्थलांतरास कार्योत्तर मान्यतेबाबत.

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
शासन निर्णय क्रमांकः प्राशास्थ ३२१८/प्र.क्र.४४५/एसएम-१
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १७ ऑक्टोबर, २०१८

वाचा : शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांकः माशास्थ २०१२/ (५९/१२)माशि-२, दिनांक ३१ जुलै, २०१३.

संदर्भ : विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई यांचे क्र.शिउसं/नावि/प्राथ-१/खाप्राशा/स्थ/२०१८/ ९०४०/४१, दिनांक ७/०५/२०१८ चे पत्र

प्रस्तावना :

कै.लोकनेते नानासाहेब उत्तमराव पाटील बहुउद्देशिय मित्र मंडळ, नाशिक संचलित विद्या विकास प्राथमिक विद्यामंदिर, काझी गढी, कुंभार टेक, जि.नाशिक या मराठी माध्यमाच्या अनुदानित प्राथमिक व उच्च प्राथमिक शाळेचे, दत्तनगर, चुंचाळे शिवार, अंबड, जि.नाशिक येथे केलेल्या स्थलांतरास कार्योत्तर मान्यता प्रदान करण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :

काझी गढी हा भाग धोकादायक घोषित झाल्याने नाशिक महानगरपालिकेने शाळेच्या स्थलांतराबाबत नोटीस काढल्यामुळे संस्थेने शाळेचे स्व:मालकीच्या प्रशस्त इमारतीत केलेल्या स्थलांतरास खाली नमूद अटी व शर्तीवर मान्यता देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. :-

(१) स्थलांतरीत शाळेची, किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही.

(२) स्थलांतरापूर्वीच्या सर्व विद्यार्थ्यांचे जवळच्या शाळेत/ स्थलांतराच्या ठिकाणी समायोजन केले आहे व याबाबत कोणतीही तक्रार/ आक्षेप नाही याबाबत शिक्षणाधिकारी(प्राथमिक), जिल्हा परिषद, नाशिक यांनी खात्री करणे आवश्यक राहील.

(३) स्थलांतरास सर्व शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी यांची सहमती आहे, तसेच सर्व पात्रताधारक शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांना स्थलांतरित ठिकाणी सामावून घेण्यात आले आहे व त्यांच्या सेवाशर्तीमध्ये बदल करण्यात आलेले व येणार नाहीत याबाबत संस्थेचे अध्यक्ष/ सचिवांचे रू.१००/- च्या स्टॅम्पपेपरवर नोटरी केलेले शपथपत्र घेण्यात यावे.

(४) बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ नुसार व शासनाकडून वेळोवेळी देण्यात येणाऱ्या आदेशानुसार, शाळेसाठी आवश्यक सर्व भौतिक सुविधा व शैक्षणिक सुविधा उपलब्ध करून देण्यात येतील, याबाबत संस्थेचे अध्यक्ष/ सचिवांचे रू.१००/- च्या स्टॅम्पपेपरवर नोटरी केलेले शपथपत्र घेण्यात यावे.

(५) स्थलांतरीत शाळेच्या बाबतीत शासन परवानगीच्या व मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाही.

(६) शाळा, शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/ वेतनेतर अनुदान, विद्यार्थी इ. बाबत शासनाकडून वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, शासन निर्णय, आदेश इ. चे पालन करणे संस्थेस बंधनकारक राहील.

(७) सदर शाळा मुळ ठिकाणी अनुदानाच्या ज्या तत्वावर होती, त्याच तत्वावर स्थलांतरीत ठिकाणी मंजूरी देण्यात यावी.

(८) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, दिनांक २८/०८/२०१५ नुसार विहित केलेल्या संच मान्यतेच्या सुधारित निकषानुसार व याबाबत शासनाकडून वेळोवेळी देण्यात येणाऱ्या आदेशांनुसार अनुज्ञेय होणाऱ्या पदांइतके शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी शाळेत कार्यरत राहतील व सदर पदांपैकी रिक्त पदे अतिरिक्त कर्मचाऱ्यांमधून समायोजनाने भरण्याबाबत शासनाच्या धोरणानुसार कार्यवाही करणे आवश्यक राहील.

(९) सदरहू स्थलांतरासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे कोणत्याही प्रकारच्या तक्रारी वा आक्षेप आल्यास किंवा स्थलांतरासंदर्भातील अटींचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास स्थलांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

(१०) भविष्यात शासन मान्यतेशिवाय शाळेचे स्थलांतरण करण्यात येणार नाही, याची संस्थेने दक्षता घेणे आवश्यक राहील.

२. वरील अट क्र.(२), (३) व (४) ची पूर्तता झाल्यावर, विभागीय शिक्षण उपसंचालक, नाशिक विभाग, नाशिक यांनी सदरहू शाळेच्या स्थलांतरास मान्यता देण्याबाबत आवश्यक पुढील कार्यवाही करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास कळविण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१७१६२९४२५९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2018.10.17 16:35:28 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) विभागीय शिक्षण उपसंचालक, नाशिक विभाग, नाशिक
३) शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, नाशिक
४) शिक्षणाधिकारी, महानगरपालिका शिक्षण विभाग, नाशिक
५) अध्यक्ष, कै.लोकनेते नानासाहेब उत्तमराव पाटील बहुउद्देशिय मित्र मंडळ, नाशिक
६) निवडनस्ती ( एसएम-१)